राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत
२६४ अस्थायी पदांना मुदतवाढ मिळणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः क्षनिका-२०१८/अपदे/प्र.क्र.२५९/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ८ व १० वा मजला,मंत्रालय, मुंबई
तारीख: १६ मार्च,२०२०

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि.६ ऑगस्ट, २००७
२) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग कमांक: क्षनिका/अस्थायी पदे २०१०/प्र.क्र.३०५/आरोग्य-५, दि.०३/०६/२०११
३) शासन निर्णय क्रमांकः क्षनिका-२०१८/अपदे/प्र.क्र.२५९/आरोग्य-५, दि. २३.०९.२०१९
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क, दि.१२ फेब्रुवारी,२०२०
५) शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१९ /प्र.क्र. ५६/आरोग्य-५, दि.२२ मे,२०१९
६) सह संचालक आरोग्य सेवा (अ.व प्र.) मुंबई यांचे पत्र क्र. अआसे/राष्ट्रीय क्षय नियं व मुल्य/सन २०२०-२१/अस्थाई पदे/चालू ठेवणे/२६४ अप/कक्ष-१८/८१-८२ /२०२० दि०२.०३.२०२०

## शासन निर्णय-

राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत १३१० पदे संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली असून त्यापैकी ८३१ पदे अस्थायी ठेवण्यात आली. या ८३१ अस्थायी पदांपैकी ८० % प्रमाणे ५७५ अस्थायी पदे वरील अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये स्थायी करण्यात आली आहेत. उर्वरित २६४ अस्थायी पदांना संदर्भांकित क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने २६४ पदांना दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) या पदांचा खर्च शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्रातील पदानामांसमोर दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१९-२० साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२) सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१६१००७४७६५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b4e19876ab3eec36e3a3b988441648ab87470cdfe66b14cfbe7ac9bd770485c1, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2020.03.17 13:24:23 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत-

१. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे-६.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे-१.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे (सर्व).
५. वैद्यकीय अधिक्षक, क्षय रुग्णालये व आरोग्य धाम (सर्व).
६. जिल्हा क्षयरोग अधिकारी, जिल्हा क्षयरोग केंद्र (सर्व).
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखाधिकारी, मुंबई.
११.वित्त विभाग, (व्यय-१३),(अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई-३२
१२.अवर सचिव, (सेवा २/३/५ व अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती